पॅराप्लेजिक रिहॅबीलीटेशन सेंटर खडकी, पुणे या संस्थेस दरवर्षी देण्यात येणा-या अर्थसहाय्यात वाढ करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. सैकवि-२०२१/प्र.क्र.३११/२८(मासैक),**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २० मार्च, २०२४.

**वाचा :** १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००९/प्र.क्र.२५७/२८, दिनांक - १५ फेब्रुवारी, २०१२.
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.२२१०१/अनुदान वाटप २०२३-२४/ सैकवि-१०, दिनांक ०२/०१/२०२४.

**प्रस्तावना :**

पॅराप्लेजिक रिहॅबीलीटेशन सेंटर,खडकी, पुणे या संस्थेस १०० टक्के अपंगत्व प्राप्त झालेल्या माजी सैनिकांच्या पुनर्वसनासाठी, वास्तव्यासह त्यांच्यावरील उपचारावर होणारा खर्च इ. सुविधांसाठी संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील शासन निर्णयानुसार प्रतिवर्षी रु. १०,००,०००/- (रुपये दहा लक्ष फक्त) इतके अर्थसहाय्य मंजूर करण्यात येते.

सदर संस्थेमध्ये महाराष्ट्र राज्यातील अधिवासी असलेल्या पॅराप्लेजिक माजी सैनिकांची सर्व देखभाल करण्यात येत असल्याची बाब व शासनाची जबाबदारी विचारात घेता तसेच वाढत्या महागाई निर्देशांकाच्या पार्श्वभूमीवर तसेच मागील ११ वर्षाहून अधिक काळ उक्त सहायक अनुदानात कोणतीही वाढ न झाल्यामुळे प्रस्तुत १३ पॅराप्लेजिक माजी सैनिकांमागील वार्षिक खर्चाच्या अनुषंगाने या संस्थेतील पॅराप्लेजिक माजी सैनिकांच्या पुनर्वसनासाठी प्रतिवर्षी देण्यात येणा-या अनुदानात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

उपरोक्त पार्श्वभूमीवर पॅराप्लेजिक रिहॅबीलीटेशन सेंटर खडकी, पुणे या संस्थेतील महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेल्या पॅराप्लेजिक माजी सैनिकांच्या पुनर्वसनासाठी संदर्भाधिन दिनांक १५ फेब्रुवारी, २०१२ च्या शासन निर्णयान्वये देण्यात येणाऱ्या प्रतीवर्ष रुपये १०,००,०००/- (रुपये दहा लक्ष फक्त) इतक्या अनुदानात वाढ करुन ते प्रतीवर्ष रुपये रु.१९,५०,०००/- (रुपये एकोणवीस लक्ष पन्नास हजार फक्त) एवढे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबीवरील खर्च मागणी क्रमांक ए-५, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०- इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १९९- इतर अशासकीय संस्थाना सहाय्य, (००) (०६) - विकलांग पॅराप्लेजिक रिहॅबीलीटेशन सेंटर, खडकी, पुणे यांना सहायक अनुदान, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३५B०५८)' या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी संचालक , सैनिक कल्याण विभाग, पुणे (A००२६) हे नियंत्रक अधिकारी आहेत तसेच लेखाधिकारी, सैनिक कल्याण विभाग, पुणे (२२०१०००१३०) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात आले आहे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौ.सं.-९६/२०२४, व्यय-४ दिनांक- ०१ फेब्रुवारी , २०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०३२१११३५६३००७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

URMILA POPAT SAWANT

Digitally signed by URMILA POPAT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=532e1c167ebaaff43f5811aa7e45b8f790eb47c4f4cdf5bad586d61ab9901df2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C586C9348CA72192AB033313815E031BC4374F8A3A8575A392F3FE875E8661EC, cn=URMILA POPAT SAWANT
Date: 2024.03.21 12:26:45 +05'30'

**( उर्मिला सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव,
२.मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/खाजगी सचिव,
३.मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/खाजगी सचिव
४.मा. राज्यमंत्री (मासैक) यांचे स्वीय सहाय्यक,
५.महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७.महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा), महाराष्ट्र, मुंबई,
८.पॅराप्लेजिक रिहॅबिलीटेशन सेंटर, खडकी, पुणे
९.कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
१०.जिल्हाधिकारी, पुणे, जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
११.संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११००६ (५ प्रती),
१२.सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,
१३.सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,
१४.वित्त विभाग (व्यय ४) (अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई ४०००३२,
१५.सामान्य प्रशासन विभाग (कार्या २५), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१६.निवड नस्ती (२ प्रती).
१७.संग्रहार्थ.